

# फळं-भाज्या विक्रेता

लेखक : रॉनी शॉटर

चित्रे: जनेट विंटर





*रूबी रुबेन्स्टीन* हा फळे आणि भाज्या विकत असे. त्याचे तत्व होते "मी लोकांची काळजी घेतो." आठवड्यातील सहा दिवस, सूर्योदय होण्याआधीच, रूबी उठत असे.

"किती वाजलेत, रूबी?" त्याची बायको ड्रुडी पांघरुणाआडून नेहमी विचारत असे.

"वेळ झाली," रुबी ठरलेले उत्तर देत असे. मग तो पलंगावरून उतरत असे, वाकून आपल्या गुडघ्यांना आणि पायांच्या अंगठ्यांना हात लावत असे आणि दुकानासाठी अगदी ताजेतवानी, टवटवीत फळे आणि भाज्या आणायला बाजारात पळत असे.

गेली पन्नास वर्षे त्याचा हा शिरस्ता चुकला नव्हता कधी – अगदी जेव्हा ड्रुडी आणि तो एक नवं आयुष्य सुरू करायला जहाजात बसून सागर पार करून इथे आले होते, तेव्हापासून.



*सन-हो,* त्याची छोटी बहीण *यंग-मी*, आणि त्यांचे आईबाबा एक नवे आयुष्य सुरू करायला विमानाने इथे आले होते. रोज शाळेत जाण्याआधी ते रूबीचा मजेशीर खेळ बघायला त्याच्या दुकानात येत.

“चला, रूबी आजोबा!” सन-हो त्यांना आवाज देत असे. “दाखवा खेळ !”



मग मान हलवून रूबी सफरचंद, संत्री आणि पेअर फळांची रास पिरॅमिडच्या आकारात रचत असे, द्राक्षे हिऱ्याच्या आकारात रचत असे, त्यांच्या अध्येमध्ये सॅलॅडची पाने लावून ठेवत असे आणि ब्रोकोलीच्या घडाने किंवा अळीवाच्या पानांनी फळांची रास सजवत असे.

रूबीला पाहून असे वाटे की एखादा महान कलाकार आपली कलाकृती घडवत आहे. आपलं भाग्य थोर म्हणून आपल्याला हे प्रत्यक्ष बघायला मिळते, अशी काहीशी भावना सन-होच्या मनात उत्पन्न होत असे. “हे एखाद्या चित्रासारखं वाटतं, रुबी आजोबा!” सन-हो लाजत म्हणत असे.

रूबी नेहमीच हसून प्रतिसाद देत असे. त्यामुळे सन-होला प्रसन्न वाटत असे. त्याच्या मनात एक इच्छा जागृत होत असे. रूबी टरबूजांच्या कसरती करत असे, त्यांचे छानसे काप करत असे आणि प्रत्येक काप प्लास्टीक पेपरमध्ये लपेटून ठेवत असे. सन-हो हे सर्व बारकाईने पाहात असे. हे पाहून त्याच्या मनातील इच्छा प्रबळ होत असे.

“तो एक कलाकार आहे, त्यात काय विशेष,” वृद्ध एला खिशात एक सफरचंद आणि काही आलूबुखार ठेवत म्हणत असे.

रूबीला वाईट वाटत नसे. तो फक्त डोळे मिचकावत असे आणि एकच शब्द उच्चारत असे, “चव बघा!” मग तो त्या दिवशी दुकानात असलेली खास गोष्ट सन-होला, त्याच्या बहिणीला आणि इच्छुक गिऱ्हाईकांना दाखवत असे.





“रूबी नसता तर आपण काय केलं असतं?” एका कुंद दुपारी मेरी मॉरीस्सीने दुकानात आलेल्या गिऱ्हाईकांना विचारले. डिलानो मार्गावर राहाणाऱ्या लोकांनी उसासे टाकले आणि हा विचार भयंकर आहे, अशा अर्थाने माना डोलावल्या.

“रूबी आजोबा,” सन-हो म्हणाला, “एकदम मस्त आहेत.”



होय, डिलानो मार्गावर राहाणारे लोक रूबीचे खूप कौतुक करत. पण रूबी आता म्हातारा झाला होता. अलिकडे, सकाळी उठून आपल्या गुडघ्याला आणि पायाच्या अंगठ्याला हात लावताना त्याचे अंग ताठर होत असे. पण काहीच समस्या नाही, असे रूबी दाखवत असे. ड्रुडी त्याच्या हाडांचा करकर आवाज ऐकलाच नाही, असे दाखवत असे. आणि रूबी कबूल करत नसला तरी, काहीवेळा, त्याला आणखी थोडा वेळ चादरीत झोपून राहावेसे वाटत असे.

“रूबी,” एकदा सकाळी ड्रुडी चादरीआडून त्याला म्हणाली. “फार वर्षांपूर्वी आपण मिळून एक निश्चय केला होता. आपण म्हातारे झालो की दुकान विकून डोंगरावर राहायला जायचं, असं आपण ठरवलं होतं. ती वेळ आलीय का आता, रूबी?”

“नाही!!” रूबी ओरडला. आणि तो पलंगावरून उडी मारत उतरला. त्याने नेहमीपेक्षा दुप्पट व्यायाम केला आणि मग बाजारात पळाला.




आपण अजून तरूण आहोत हे दाखवण्यासाठी त्याने त्या दिवशी दुकानात चांगलेच कष्ट उपसले. त्याने फळांची आणि भाज्यांची आजवरच्या सर्वात सुंदर प्रकारे रचना केली.

त्या दिवशी दुपारी, सन-हो आला तेव्हा रूबी बटाट्यांची एका खास पद्धतीने रचना करत होता. सन-होने पाहिले की रूबी बटाटे मोठ्या कौशल्याने हवेत फेकत होता. प्रत्येक बटाटा आधीच्या बटाटयाशेजारी येऊन पडत होता आणि बटाट्यांची एक छानशी रांग तयार होत होती.



“व्वाव, रूबी आजोबा!” सन-हो मोठ्या कौतुकाने म्हणाला. “मला शिकवाल हे?”

मोठ्या अभिमानाने रूबीने एक बटाटा आणि दोन सफरचंद उचलली आणि तो सन-होला कसरती शिकवू लागला. मग त्याने द्राक्षे कशी रचून ठेवायची, जेणेकरून ती खाली पडणार नाहीत, हे त्याला शिकवले. सन-होचे आईबाबा येईपर्यंत रूबीने त्याला दुकानाच्या हिशोबाचे काम कसे करतात, हेसुद्धा दाखवले. मग आपण सकाळी लवकर उठून कसे बाजारात जातो आणि दुकानासाठी फळे, भाज्या निवडून आणतो, याची माहितीही रूबीने सन-होला दिली.

“मला न्या तुमच्यासोबत!” सन-होने विनवणी केली. आपल्या मनातील तीव्र इच्छा दाबून धरणे त्याला अशक्य झाले. “प्लीज?”





रूबीने थोडा विचार केला. मग तो म्हणाला, “हे तर माझं सौभाग्य आहे.”

पुढल्या दिवशी भल्या पहाटे, आभाळात शुक्राची चांदणी चमचमत होती तेव्हा, रूबी सन-होला घेऊन बाजारात गेला. सन-होचे नाक चांगलेच तीक्ष्ण होते. त्याने आणि रूबीने सर्वात चविष्ट फळे आणि भाज्या निवडल्या. मग रूबीने विक्रेत्यांशी घासाघीस करून परवडणाऱ्या किंमतीत फळे आणि भाज्या खरेदी कशा करायच्या, हे दाखवले.

दिवसभर सन-होला आपण कुणी खास आहोत असे वाटत होते. आणि रूबी? तो खरंतर....थकला होता. ट्रुडी गिऱ्हाईकांसोबत कामात दंग असताना रूबी खाली वाकला आणि जणू काही तो बुटांच्या नाड्या बांधत आहे, असे दाखवू लागला.






पण खरंतर तो जांभया देत होता. दुपारपर्यंत, तो थोड्या थोड्या वेळाने सारखा दुकानाबाहेर जात होता. “फळं!” तो ट्रकडीकडे बघून मोठ्याने बोलला. “फळांची व्यवस्था लावावी लागेल!” तो म्हणाला. पण बाहेर गेल्यावर, तो शिंकत बसत असे.

“तुमच्या तब्येतीसाठी, रूबी आजोबा,” सन-हो त्याला रुमाल देत कुजबुजला.

“आभारी आहे, सन-हो,” रूबी शांतपणे नाक साफ करत म्हणाला. संध्याकाळी डिलानो मार्गावर हिमवर्षाव झाला.



रात्रभर हिमवृष्टी झाली. सकाळपर्यंत रस्ता कोबीच्या फुलांसारखा पांढराशुभ्र आणि थंडगार झाला.

इतक्या वर्षांत पहिल्यांदाच रूबीला अंगात अशक्तपणा जाणवला. त्याचा चेहरा निस्तेज झाला आणि कपाळ गरम झाले. “आज काम नाही करायचं,” ड्रुडी म्हणाली. “रूबीचं फळं आणि भाज्यांचं दुकान बंद राहील, पुढील सूचना येईपर्यंत.” मग डिलानो मार्गावरचे लोक काय करतील? पण आजारामुळे रूबी काही करूही शकत नव्हता.

त्या दिवशी सन-हो दुकानावर आला तेव्हा त्याला दुकान बंद दिसले. त्याला चिंता वाटू लागली. रूबी कुठे आहे?



वर पलंगावर रूबी झोपला होता. तो वसंत ऋतू आणि ताज्या जर्दाळू फळांचे स्वप्न बघत होता. एकदा त्याचे डोळे उघडले तेव्हा सन-हो त्याच्या शेजारी उभा होता....तो खरंच होता का तिथे?

"चिंता करू नका," त्याला सन-हो बोलल्याचा भास झाला. "मी सांभाळून घेईन." मग सन-हो जसा अचानक प्रकट झाला तसाच अचानक गायब झाला. रूबी स्वप्न बघत होता का?

पुढले तीन दिवस, रूबी एवढा आजारी होता की आयुष्यात पहिल्यांदाच त्याच्या मनात आपल्या दुकानाचा विचार आला नाही. तो आपल्या चादरीत ड्रुडीच्या प्रेमळ सेवेचा, तिने बनवलेल्या बार्ली सूपचा आनंद घेत पडून राहिला. चौथ्या दिवशी सकाळी, त्याला थोडे बरे वाटू लागले. मग त्याला दुकानाची चिंता खाऊ लागली. पाचव्या दिवशी, शनिवारी, तो स्वतःला रोखू शकला नाही. "माझं दुकान!" तो ओरडला. ड्रुडीचा आधार घेऊन त्याने कपडे बदलले आणि घाईघाईत दुकान उघडायला निघाला.




दुकानात पोहोचल्यावर तो चकीत झाला. दुकान खुले होते. ते कधी बंद होते, असे वाटतच नव्हते. फळे पिरॅमिडच्या आकारात, खजूर हिऱ्याच्या आकारात, टोमॅटो त्रिकोणी आकारात रचून ठेवलेले होते. सन-होचे वडील एलाला गाजर तोलण्यास मदत करत होते. सन-होची आई पैशाचे हिशोब सांभाळत होती. यंग-मी पेअरची फळे साफ करत होती. आणि या सर्वांच्या मधे सन-हो स्मित करत उभा होता. तो गिऱ्हाईकांना एक नवीन पदार्थ चाखायला देत होता.

रूबीला पाहून सर्वांनी त्याचे स्वागत केले. रूबीने आनंदाने वाकून सर्वांना नमस्कार केला.

“मी सगळं सांभाळलं, रूबी आजोबा!” सन-हो अभिमानाने म्हणाला.

“हो, पाहिलं मी!” रूबी म्हणाला. “आता तूसुद्धा माझ्यासारखाच फळं आणि भाज्यांचा विक्रेता वाटतोस, सन-हो.”

सन-होचा चेहरा रूबीच्या लाल मुळ्याच्या भाजीसारखा लाल झाला. त्याच्या मनात जागृत झालेली प्रबळ इच्छा आता गायब झाली. त्याच्या जागी आता नवी भावना प्रकट झाली, अभिमान.

“वेळ झाली का, रूबी?” ह्रुडी कुजबुजली.

रूबीने उसासा टाकला. तो विचार करू लागला, “आपल्याला सन-हो आणि त्याच्या कुटुंबाचा किती लळा लागलाय! त्यांनी आपलं दुकान किती व्यवस्थित सांभाळलंय!” मग तो आपल्या गुडघ्यातील दुखणं आणि करकर आवाजाचा विचार करू लागला. तो डोंगर आणि ह्रुडीच्या प्रेमळ मायेचा विचार करू लागला. पण सर्वात जास्त विचार तो ह्रुडीच्या हातच्या बार्ली सूपचा करू लागला.

“वेळ झाली,” शेवटी तो म्हणाला.

आता सन-हो फळं आणि भाज्यांचा विक्रेता आहे! रोज सकाळी, सूर्योदय होण्याआधी, शाळेची वेळ होण्याआधी, सन-हो आणि त्याचे कुटुंब उठतात आणि दुकानासाठी चवदार फळे आणि ताज्या भाज्या यांची निवड करण्यासाठी बाजारात जातात.





आणि रूबी? अजूनही तो फळे आणि भाज्या विकतो.... एवढंच की तो आणि ड्रुडी आता त्यांची लागवडही स्वत:च करतात.



**समाप्त**